**अनेर प्रकल्पावरील यांत्रिकी कामाअंतर्गत वक्रद्वारे देखभाल व द्वार दुरुस्ती करिता कामांचे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणे**

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. दुरुस्ती-२०१०(३८२/२०१०)/सिंव्य(कामे)
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २९.१०.२०१०

पहावे : मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव, यांचे पत्र क्र. जा.क्र.मुअ/तापाविम/प्रशा-६/२५४१/सन २०१०, दि.१.६.२०१०

**प्रस्तावना :**

अनेर मध्यम प्रकल्पाच्या १२ X ६.५० मी.आकाराच्या १० वक्रद्वारांची उभारणी अंदाजे ३० वर्षापूर्वी झालेली आहे. दिनांक ६.८.२००६ ते दि.९.८.२००६ या कालावधीत आलेल्या अतिवृष्टीमुळे या धरणाच्या सांडव्यावरुन संकल्पीत पूरापेक्षा अधिक पूर गेल्याने या प्रकल्पाचा अँकर गर्डर ब्रीज वाहून गेला व वक्रद्वाराचे ही नुकसान झाले. अँकर गर्डर ब्रीज वाहून गेल्यामुळे वक्रद्वारांची दुरुस्तीचे काम करता आले नाही. या सर्व बाबींचा विचार करुन दुरुस्तीच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

या शासन निर्णयान्वये अनेर मध्यम प्रकल्पाच्या वक्रद्वारांचे विशेष दुरुस्तीच्या रु.२,४१,०८,८३७ च्या खर्चास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) सदर दुरुस्तीचे काम यांत्रिकी विभागाकडून करुन घेण्याच्या अटीच्या अधीन राहून अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

या कामावर होणारा खर्च मुख्य लेखाशिर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे (विस्तार व सुधारणा) योजनांतर्गत या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात येणाऱ्या अंदाजित खर्चाच्या मंजूरीपेक्षा अधिक खर्च करण्यात येऊन नये.

शासन निर्णय(वित्त विभाग) क्र.विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दि.११/७/२००१ मधील अ.क्र.भाग-१ उपविभाग-३ मधील अ.क्र.४ मध्ये विहित केल्यानुसार अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रु.५.०० कोटीपर्यंत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संबंधित विभागास प्रदान केले आहेत. त्या अधिकारानुसार हे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.सदर शासन निर्णय शासनाच्या संकेत स्थळावर(www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात येत असून त्यांचा संगणक सांकेतांक २०१०१०२९१८१८१७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**(सं.दे.कुलकर्णी)**
**शासनाचे उप सचिव**

प्रत :

महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई
मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
आंतरवित्त सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव,
मुख्य अभियंता(यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक,
मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव,
अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ (द्वारे),पुणे-१,
अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, जळगाव,
कार्यकारी अभियंता, धुळे पाटबंधारे विभाग, धुळे,
ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.